ई-ऑफीस प्रणालीच्या माध्यमातून कार्यालयीन कामकाज करण्यासाठी महसूल व वन विभाग, मंत्रालय (खुद्द) मधील सर्व कार्यासनांकरिता कार्यासननिहाय अधिकाराचे प्रदान, सादरीकरणाचे टप्पे कमी करण्याबाबत -

# महाराष्ट्र शासन

## महसूल व वन विभाग

## शासन परिपत्रक क्रमांकः ओएफएम-२०२५/प्र.क्र.९३/ई

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई -४०० ०३२.
तारीख: २४.०२.२०२५

वाचा -

१) शासन अधिसूचना सामान्य प्रशासन विभाग, क्रमांकः एसआरव्ही-२००४/प्र.क्र.१५/१२, दि.२५.५.२००६
२) शासन अधिसूचना, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांकः पीडीओ-१००७/प्र.क्र.९/१८(र. व का.), दि.१४.११.२०१३
३) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांकः संकीर्ण-२०१२/प्र.क्र.५४/१८(र.व.का.), दि.११.८.२०१४
४) शासन परिपत्रक, महसूल व वन विभाग, क्रमांकः ओएफएम-२०१७/प्र.क्र.५८८/ई, दिनांक २२.०६.२०१८
५) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांकः संकीर्ण-२०२३/प्र.क्र.०२/१८(र.व.का.), दि.०२.०२.२०२३
६) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांकः कार्यप-२०२३/प्र.क्र.०१/१८(र.व.का.), दि.१५.०६.२०२३

शासन परिपत्रक:-

शासकीय कार्यालयात पारदर्शकता व गतीमानता आणण्याच्या दृष्टीने "महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधनियम, २००५" हा राज्यात लागू करण्यात आला असून अधिनियमातील प्रकरण ३ करिता "शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध नियम २०१३" दिनांक १४ नोव्हेंबर, २०१३ च्या अधिसूचनेद्वारे राज्यात लागू करण्यात आले आहेत. वरील अधिनियमाच्या कलम ९ व सदर नियमाच्या नियम क्र. ६ नुसार विभागात हाताळण्यात येणाऱ्या

विविध विषयांचे स्वरुप, स्तर आणि महत्व विचारात घेऊन विभागाशी संबंधित बाबींवर अंतिम निर्णय घेण्याच्या दृष्टीने त्या सादर करण्यासाठी अधिकारांचा स्तर निर्धारित करण्याचे निदेश दिले आहेत. याबाबत सामान्य प्रशासन विभागाच्या उपरोक्त संदर्भ क्र.३ येथील दिनांक ११.०८.२०१४ च्या परिपत्रान्वये देखील सूचना देण्यात आल्या आहेत. या अनुषंगाने, उपरोक्त सदंर्भ क्र.४ येथील दिनांक २२.०६.२०१८ रोजीच्या शासन परिपत्रकान्वये महसूल व वन विभाग, मंत्रालय (खुद्द) मधील विषयासाठी सर्व कार्यासनांकरिता कार्यासननिहाय सादरीकरणाचे स्तर निश्चित करण्यात आले आहेत.

२. सामान्य प्रशासन विभाग, शासन परिपत्रक क्र. संकीर्ण-२०२३/प्र.क्र.०२/१५ (र व का), दिनांक ०२.०२.२०२३ अन्वये मंत्रालयीन विभाग व त्यांच्या अधिपत्याखालील कार्यालयांमध्ये ई-ऑफिसप्रणालीच्या माध्यमातून पत्रव्यवहार करण्याबाबत सर्वकष सूचना देण्यात आल्या आहेत. तसेच सामान्य प्रशासन विभाग, शासन परिपत्रक क्र.कार्यप-२०२३/प्र.क्र.०१/१८ (र वका), दिनांक १५.०६.२०२३ अन्वये महाराष्ट्र कार्यालयीन कार्यपध्दती नियमपुस्तिका २०२३ च्या अंमलबजावणीबाबत मार्गदर्शक सूचना निर्गमित करण्यात आल्या आहेत. महाराष्ट्र कार्यालयीन कार्यपध्दती नियमपुस्तिका २०२३ या नियमपुस्तिकेमध्ये कार्यालयीन कामकाज हाताळण्याबाबत तसेच डिजिटल व ई-ऑफीस प्रणालीच्या माध्यमातून कार्यालयीन कामकाज पध्दती व आधुनिक तंत्रज्ञानावर आधारित नवीन मार्गदर्शक सूचना अंतर्भूत करण्यात आल्या आहेत.

३. ई-ऑफीस प्रणालीच्या माध्यमातून कार्यालयीन कामकाज करण्यासाठी महसूल व वन विभाग, मंत्रालय (खुद्द) मधील सर्व कार्यासनांकरिता कार्यासननिहाय सोबतच्या परिशिष्ट-अ मध्ये दर्शविल्याप्रमाणे सादरीकरणाचे स्तर निश्चित करण्यात येत आहेत.

४. तसेच शासन परिपत्रक, महसूल व वन विभाग, क्रमांक ओएफएम-२०१७/प्र.क्र.५८८/ई, दिनांक २२.०८.२०१८ नुसार व त्यासोबतच्या परिशिष्टामध्ये दर्शविल्याप्रमाणे महसूल व वन विभाग, मंत्रालय (खुद्द) मधील विषयासाठी सर्व कार्यासनांकरिता कार्यासननिहाय सादरीकरणाचे स्तर निश्चित करण्यात आले आहेत. सदर सादरीकरणाचे स्तर हे ई-ऑफीस प्रणालीद्वारे फाईल/नस्ती सादर करण्यासाठी देखील लागू राहतील. यामध्ये वरिष्ठ अधिकाऱ्यांचे निदेश असल्यास किंवा काही विशिष्ट अपवादात्मक प्रकरणी आवश्यकता भासल्यास प्रकरणपरत्वे त्यामध्ये योग्य बदल करण्यात येईल. तसेच आवश्यकतेनुसार संबंधित बाबी/प्रकरणी वरीष्ठ स्तरावर अंतिम निर्णयार्थ सादर करता येतील.

५. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून संकेताक २०२५०२२४१६०७००३११९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

DNYANADEV LAXMAN SUL

Digitally signed by DNYANADEV LAXMAN SUL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=Revenue and Forest Department, 2.5.4.20=a19e16d10b98348341561863c7561e9fc35bb428cdc3ea443c0263495f76285a, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=0a540933faf44a550ca357b423fa83e6fdce81a4746d167dae68daa29726d41d, cn=DNYANADEV LAXMAN SUL
Date: 2025.02.24 16:08:13 +05'30'

**( ज्ञा.ल. सुळ )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा.मंत्री (महसूल) यांचे खाजगी स्वीय सहायक,
२) मा.राज्यमंत्री(महसूल) यांचे खाजगी स्वीय सहायक,
३) अपर मुख्य सचिव, (र. व का.),सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
४) अपर मुख्य सचिव (महसूल, मुद्रांक शुल्क व नोंदणी) यांचे स्वीय सहायक, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई,
५) सह सचिव/उप सचिव यांचे स्वीय सहायक, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
६) सर्व अवर सचिव/कक्ष अधिकारी, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
७) सह सचिव (आस्थापना) यांचे स्वीय सहायक, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
८) नोंदणीशाखा/रोख शाखा, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
९) निवडनस्ती

परिशिष्ट-अ

(शासन आदेश क्र.ओएफएम-२०२५/प्र.क्र.९३/ई, दि. २४.०२.२०२५)

**महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधनियम, २००५, मधील कलम ९ (१) व ९(२) अन्वये तसेच** ई-ऑफीस प्रणालीच्या माध्यमातून कार्यालयीन कामकाज करण्यासाठी **महसूल व वन विभाग (खुद्द) संबंधित खालील नमूद बाबींवर अंतिम निर्णय घेण्याच्या दृष्टीने प्रकरण सादर करणाऱ्या अधिकाऱ्यांचे निर्धारित केलेले त्रिस्तर.**

| अ.क्र. | विषय | सादरी करणाचे ३ स्तर | | | अंतिम निर्णय घेण्यास सक्षम प्राधिकारी | आदेश/प्रमाणपत्र/पत्र निर्गमित करण्यास सक्षम प्राधिकारी |
|---|---|---|---|---|---|---|
| | | प्रथम | द्वितीय | तृतीय | | |
| १. | २. | ३. | ४. | ५. | १. | २. |
| १. | महसूल व वन विभाग (खुद्द) मधील कार्यासने व शाखा या मध्ये विषयांची वाटणी करणे, तसेच विभागाची रचना व कार्यपध्दती. | क.अ/अ.स. | उ.स./स.स. | प्र.स. (महसूल)/ अ.मु.स. (महसूल) | मा.मंत्री (महसूल) | क.अ./अ.स./उ.स./प्र.स./ अ.मु.स. (महसूल) |
| २. | मंत्री मंडळाच्या बैठकी संबंधिच्या सर्व साधारण बाबी, तसेच शासन मान्यतेसाठी सादर करावयाची प्रकरणे. | क.अ/अ.स. | उ.स./स.स. | प्र.स. (महसूल)/ अ.मु.स. (महसूल) | मा.मंत्री (महसूल) | क.अ./अ.स./उ.स./ प्र.स./ अ.मु.स. (महसूल) |
| ३. | इतर विभागाकडून अभिप्रायार्थ प्राप्त झालेल्या नस्त्या. | क.अ/अ.स. | उ.स./स.स. | प्र.स. (महसूल)/ अ.मु.स. (महसूल) | प्र.स. (महसूल)/ अ.मु.स. (महसूल) | क.अ./अ.स./उ.स./ प्र.स./ अ.मु.स. (महसूल) |
| ४. | विधानमंडळातील विधानसभा/ परिषदेतील कामकाजांचे व आश्वासनांचे समन्वय करणे. | क.अ/अ.स. | उ.स./स.स. | उ.स./स.स. | उ.स./स.स. | क.अ./अ.स |
| ५. | केंद्र शासनाचा माहितीचा अधिकार अधिनियम २००५ मधील तरतुदीनुसार कार्यवाहीचा अहवाल सादर करण्याबाबतचे विवरणपत्र. | क.अ/अ.स. | उ.स./स.स. | उ.स./स.स. | उ.स./स.स. | क.अ./अ.स |

| | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| ६. | विभागाच्या स्तरावर निर्णय घ्यावयाची प्रकरणे, आस्थापना विषयक बाबी व इतर प्रशासकीय बाबी. | क.अ/अ.स. | उ.स./स.स. | प्र.स. (महसूल)/ अ.मु.स. (महसूल) | प्र.स. (महसूल)/ अ.मु.स. (महसूल) | क.अ./अ.स. |
| ७. | विधीमंडळ कामकाज कोणत्या कार्यासनाने हाताळावे याबाबत निर्णय. | क.अ/अ.स. | उ.स./स.स. | प्र.स. (महसूल)/ अ.मु.स. (महसूल) | प्र.स. (महसूल)/ अ.मु.स. (महसूल) | क.अ./अ.स. |
| ८. | नागरिकांची सनद. | क.अ/अ.स. | उ.स./स.स. | प्र.स. (महसूल)/ अ.मु.स. (महसूल) | मा.मंत्री (महसूल) | क.अ./अ.स./उ.स./ प्र.स./ अ.मु.स. (महसूल) |
| ९. | इतर विभागाकडून प्राप्त झालेल्या संदर्भाच्या अनुषंगाने समन्वय. | क.अ/अ.स. | उ.स./स.स. | प्र.स. (महसूल)/ अ.मु.स. (महसूल) | मा.मंत्री (महसूल) | क.अ./अ.स./उ.स./ प्र.स./ अ.मु.स. (महसूल) |
| १०. | प्रलंबित संदर्भ व प्रकरणे याबाबतचा समन्वय | क.अ/अ.स. | उ.स./स.स. | -- | उ.स./स.स. | क.अ./अ.स. |
| ११. | विधानमंडळ कामकाज तसेच विभागास प्राप्त होणाऱ्या संदर्भाच्या अनुषंगाने अधिनस्त कार्यालयाकडून अहवाल मागविणे. | क.अ/अ.स. | उ.स./स.स. | -- | उ.स./स.स. | क.अ./अ.स. |
| १२. | विभागामध्ये घेण्यात येणारी धोरणात्मक बाबींची प्रकरणे. | क.अ/अ.स. | उ.स./स.स. | प्र.स. (महसूल)/ अ.मु.स. (महसूल) | मा.मंत्री महसूल) | उ.स./स.स./प्र.स. / अ.मु.स. (महसूल) |
| १३. | विभागामध्ये प्राप्त होणारी न्यायालयीन प्रकरणे/ लोकायुक्त प्रकरणे | क.अ/अ.स. | उ.स./स.स. | प्र.स. (महसूल)/ अ.मु.स. (महसूल) | प्र.स. (महसूल)/ अ.मु.स. (महसूल) | क.अ./अ.स./उ.स./स.स |
| १४. | विभागातील इतर बाबी | क.अ. | उ.स./स.स. | प्र.स. (महसूल)/ अ.मु.स. (महसूल) | प्र.स. (महसूल)/ अ.मु.स. (महसूल) | क.अ./अ.स./उ.स./स.स |